हीं व्यवस्थितपणें करतां येत नाहीं, यास्तव शेतकऱ्यांनीं शिक्षण संपादन केलें पाहिजे. शेतकऱ्यांस शेतीचें शिक्षण पाहिजेच; पण अर्थशास्त्राचीही त्यास उत्तम माहिती करून दिली पाहिजे. प्रत्येक शेतकरी हा व्यापारी बनला पाहिजे. आज व्यापारीवर्ग व शेतकरी वर्ग अगदीं निरनिराळे झाले आहेत. आमच्या प्राचीन वर्णव्यवस्थेंत कृषि, गोरक्षण व वाणिज्य हीं तीन कामें एकाच वर्णाकडे होतीं यामुळें शेतकऱ्यास शेतीचा खरा फायदा मिळे. पूर्वीं शेतकरी तोच व्यापारी व व्यापारी तोच शेतकरी असे. आज व्यापारी निराळा व शेतकरी निराळा असा प्रकार झाल्यामुळें शेतकऱ्यास आपल्या कष्टाचें खरें फळ मिळत नाहीं, तें फळ थोड्या श्रमानें व्यापारीच उपटतो! याबाबतींत आम्हीं स्वानुभवाचें एक उदाहरण सांगतों. एकदां आम्हीं पैशाला सहा केळीं या दरानें एक केळघड सहा आण्यांस वाण्यास दिला. पुढें कारणपरत्वें त्याच वाण्याचे दुकानीं गेलों व भूक लागली ह्मणून पैशाचीं केळीं मागितलीं तीं त्यानें दोन दिलीं! यावरून हिशेब करतां वाण्यानें सहा आण्यांच्या केळघडावर बारा आणे नफा मिळविला असें आह्मांस दिसून आलें. वर्षभर केळीची मेहनत करून व वानरांची राखण करून आह्मीं सहा आणे मिळविले व वाण्यानें लोडाशीं टेंकून चार दोन दिवसांत बारा आणे मिळविले हा हिशेब आमच्या मनांत येतांच या विषयाकडे आमचें लक्ष लागलें. हिरडे, दावडिंगें, ताग वगैरे मालाची खरेदी खेडेगांवांतून चालते तेव्हां तागडी, वजनें व मापें यांची तऱ्हा पहावी ह्मणजे शेतकऱ्याचें अज्ञान त्यास कसें भोंवतें तें दिसेल.

निर्वाहापुरतें तरी प्रत्येकानें धान्य पिकवावें. शेतीचा धंदा केवळ

मजूर लावून अगर गडी ठेवून केला तर तो फायदेशीर होत नाहीं इतकेंच नव्हे तर आंतबट्याचाही होईल. शेतींत स्वतः राबलें पाहिजे, गडीमाणसांवर सारखें लक्ष ठेवलें पाहिजे, आपण रोज शेतांत खेप केली पाहिजे व उत्तम मशागत करून भरपूर खत दिलें पाहिजे. जसा लग्नाचा मुहूर्त साधतों तसा शेतीचा हंगाम साधावा. पेरणीचा हंगाम, बेणणीचा हंगाम व कापणीचा हंगाम यांपैकीं एक हंगाम जरीं चुकला तरी शेतींत फार नुकसान होतें. गैरहंगामी पुष्कळ शेती करण्यापेक्षां थोडीच पण हंगामी करावी. शेतीचें उत्पन्न व खर्च यांचा हिशेब ठेवावा. शेतीचीं जनावरें शेती आटोपल्यावर विनाकारण वर्षभर पोसावीं लागतात यास्तव त्यांपासून दुसरें काम घेतां येईल, अशी कांहीं तरी योजना करावी. जनावरांस खुराक दिला तर बारा महिने काम करून घेतलें तरी तीं थकत नाहींत; उलट रिकामीं ठेऊनच थकतात. जनावरांकडून घ्यावयाचें काम मात्र नियमित असावें व खाणेंपिणें वेळचेवेळीं घालावें ह्मणजे झालें.

बागायती उत्पन्न शेतीपेक्षांही चांगलें. ऊंस, मिरची, कांदा, बटाटा व भाजीपाला इत्यादि उत्पन्न हें बागायती उत्पन्न होय. बाजारची सोई असेल तर भातशेतीपेक्षांही बागाइत उत्पन्न करणें चांगलें. नारळ, सुपारी व केळीं हें आगरी उत्पन्न होय. चैत्र–वैशाखापर्यंत पाण्याचा पुरवठा असेल इतर कोणत्याही उत्पन्नापेक्षां हेंच उत्पन्न फायदेशीर पडतें व यांत त्रासही कमी करावा लागतो. कलमी आंब्यांची थोडी तरी लागवड प्रत्येकानें करावी. दाराजवळ झाडें असतील तर पानवेली अगदीं जरूर लावाव्या. पाटाचें अगर विहिरीचें पाणी असेल तर उत्तमच; पण तशी सोई नसेल तर रोज

घागरीनें पाणी घालावें. सर्व उत्पन्नांत पानवेलीचें उत्पन्न मोठें आहे. पानवेलींमुळें रोज हातांत पैसा खेळतो व किरकोळ खर्च भागतो. पैशानेंही जें काम होत नाहीं तें पानसुपारी दिल्यानें होतें. पानसुपारीचे जोडीस तंबाकू ठेवावा ह्मणजे खेडेगांवांत गिराइकांस तोटा नाही. गवत, लांकूड व इतर किरकोळ जिन्नस पानसुपारीवर घेतां येतात. दारांत नेहमीं मनुष्य येत असल्यामुळें त्यांचा उपयोग करून घेतां येतो. तात्पर्य; पानवेलींचें उत्पन्न दिसण्यांत किरकोळ पण फार उपयोगाचें आहे हें ध्यानांत ठेवावें.

आगराचें शिंपणें वगैरे करण्यास मोठ्या गड्याची गरज नाहीं; यास्तव लहान लहान पोरें नोकरीस ठेवावीं. त्यांस खर्च कमी येतो व तीं थोर मनुष्यांपेक्षां जास्त चलाख असतात आणि त्यांस मोठ्या माणसांइतकें कपट करणें माहीत नसतें. यामुळें त्यांकडून मोठ्या गड्यापेक्षांही काम जास्त होतें. मुंबईस छापखान्यांतून वर्तमान-पत्रांच्या घड्या करतांना असा अनुभव येतो कीं, थोर गड्यापेक्षां लहान मुलेंच जास्त झटपट काम करितात. चहाचे हॉटेलांत गिरा-इकास जिन्नस देण्याचे कामावर मुलेंच नेमतात. मुलांऐवजीं मोठीं माणसें नेमलीं तर मुलांप्रमाणें त्यांस झटपट काम कधींच होणार नाहीं. शिवाय त्यांस पगारही जास्त द्यावा लागेल. मोठ्या शक्तीचे कामांस मात्र मोठे गडी लावावे; परंतु घराची झाडलोट करणें, कोणास निरोप सांगण्यास पाठविणें, शेताची राखण करणें, गुरें चारणें वगैरे कामें पोरांकडूनच करवावीं. त्यांस चांगलें जेवण घालून हौसेसारखा एकादा कपडा दिला व गोड बोललें कीं, तीं खूष होतात व काम आस्थेनें करतात.

साग, कळक, कोंढे व इतर जंगली झाडें यांचीही प्रत्येकानें जमीन असेल त्या मानानें लागवड करावी. जंगली फळझाडांत हिरडा हें उत्पन्नाचें झाड आहे, शिवाय त्याचें लांकूडही उत्तम असतें. फणसाचा उपयोग केवढा आहे हें कोंकणच्या लोकांस तरी सांगावयास नको. गोरगरीबांचें तें चार महिन्यांचें अन्न आहे. शिवाय फणसपोळी केली तर एका झाडाचे वीस पंचवीस रुपये-सुद्धां दरसाल उत्पन्न होतील. जनावरेंसुद्धां फणस घातल्यानें तयार होतात. फणसाचें लांकूड सायाचे खालोखाल महत्वाचें आहे. यास्तव अशा सर्वोपयोगी झाडांची लागवड करावी. ज्याचे पदरीं जमीन आहे त्यानें वर्कस शेती न करितां वर सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या वृक्षांची लागवड करावी. काजूची लागवड हव्या त्या वर्कस जमिनींत होते. तेंही उत्पन्न बरें येतें. सारांश; एकाच प्रकारची लागवड न करितां बऱ्याच प्रकारची केली ह्मणजे हें नाहीं तर तें तरी उत्पन्न पदरांत पडतें; परंतु लागवडीचें प्रमाण कांहीं तरी मोठें पाहिजेच. नाहीं तर उत्पन्न प्रसादाखालींच संपावयाचें, शिवाय अशा अल्प लागवडीची राखण करणेंही परवडणार नाहीं. वृक्षांची लागवड शक्य तितकी पूर्व वयांत करावी, ह्मणजे त्याचें फळ आपणांस मिळेल. वृद्धापकाळीं अक्रोडाची लागवड केली तर आपणांस फळ मिळण्याची आशा नाहींच. पुढचे पिढीसाठीं ह्मणून तो उद्योग करावा. त्यास हरकत नाहीं.

बहुतेकांची जमीन बेताचीच असल्यामुळें त्यांस केवळ शेती व बागाईत यांवर निर्वाह करतां येत नाहीं. त्या धंद्यांचे जोडीस थोडासा व्यापार व घरांतील एकादा मनुष्य नोकर असावा लागतो,

खेडेगांवांत जवळ पैसा असेल तर व्याजबट्ट्याचा व्यापार चालेल. या व्यापारास आरंभीं भांडवल थोडें असलें तरी चालेल व अक्कलही फारशी नको. केवळ एक रुपयावर पन्नास वर्षांत पांसष्ट हजार रुपये मिळवितां येतात; ही गोष्ट मागें सांगितली आहेच. या धंद्यांत चिकाटी व दक्षता हे गुण मात्र पूर्ण पाहिजेत. कुळाकडील वसूल मुदतीस करणें व आलेली रक्कम लगेच व्याजीं लावण्याची तजवीज करणें याविषयीं दक्षता ठेवली पाहिजे. दुसरा व्यापार दुकानदारी होय. खेडेगांवांत दुकानदारी चालणें कठीणच व तो धंदा झाला तरी घरोघर कसचा चालणार ? गांवांत एकादें दुकान असलें कीं गांवची गरज भागली; यास्तव गांवांत दुकान असेल तर दुसरें दुकान घालण्यांत अर्थ नाहीं; तथापि पान, सुपारी व तंबाकू विक्रीस ठेवण्यास हरकत नाहीं. ज्यास द्रव्यबळ अगर मनुष्यबळ आहे, त्यानें शहरांत दुकानदारी करावी. घरांतील एकाद्या मनुष्यानें नोकरी करावी व घरचे मंडळीस पैशाची मदत करावी. ही मदत घरची मंडळी व्यवस्थितरीतीनें वागूनही जर त्यांचा निर्वाह होत नसेल तरच करावी; अथवा वडिलार्जित देणें असेल तर तें फेडण्यास करावी; परंतु घरची मंडळी अव्यवस्थितरीतीनें वागून कर्ज करीत असतील तर त्यांस पैसुद्धां देऊं नये; कारण अव्यवस्थित लोकांची सुधारणा होण्यास त्यांस कोणी पैशाची मदत न करणें हाच उपाय आहे हें लक्षांत ठेवावें.



# धडा चोविसावा.

## पुरुषांचीं आणखीं कर्तव्यें.

जमाखर्च ठेवणें, महत्वाचे कागदपत्र संभाळून ठेवणें, आपले प्रपंचांतील अनुभव लिहून ठेवणें व मुलांस शिक्षण देणें हीं कामें पुरुषांचे कर्तव्यांत येतात. प्रपंच गरीबीचा असो कीं श्रीमंतीचा असो प्रत्येकानें जमाखर्च ठेवलाच पाहिजे. महत्वाचे कागदपत्र ह्मणजे सनदा, निवाडे वगैरे एकदां तांब्याचा लांबट डबा करून त्यांत ठेवावे ह्मणजे वाळवी, कसर वगैरे प्राण्यांचा उपद्रव होणार नाहीं. प्रपंचांतील अनुभव लिहून ठेवल्यानें कालांतरानें त्यांचा आपणांस उपयोग होतो व पुढचे पिढीस तर फारच उपयोग होतो.

' माता शत्रुः पिता वैरी याभ्यां बालो न पाठितः ' हें लक्षांत ठेऊन मुलांस शिक्षण द्यावें. सर्वसाधारण व्यवहार कळण्यापुरतें प्रत्येक मुलास सामान्य शिक्षण दिल्यावर मग ज्या मुलांची ज्या विषयांत विशेष गति दिसेल, तो विषय त्यांस शिकवावा. मुलें शील-संपन्न होतील व त्यांचें चारित्र्य निष्कलंक राहील अशी पालकांनीं खबरदारी घ्यावी. त्यांचे वाचनाकडे लक्ष ठेवावें, कादंबऱ्या, नाटकें, प्रहसनें वगैरे शृंगारविषयक पुस्तकें त्यांचे हातीं पडूं देऊं नयेत. तसेंच नाटकें, तमाशे, नायकिणींचे नाच व बीभत्स चित्रें इत्यादि कामोद्दीपक दृश्यें त्यांचे दृष्टीस न पडतील तर बरें.

मुलाचें लग्न करणें हें आईबाप आपलें कर्तव्य समजतात; परंतु आमचे मतें हा समज चुकीचा आहे. पुष्कळ आईबाप आपल्या मूर्ख

मुलांचींही लग्नें करून भावी आपत्तीचें बीज पेरून ठेवतात. आई-बापांनीं मुलाच्या लग्नाची घाई न करतां त्यास योग्य शिक्षण देऊन तयार करावा. मुलगा आपलें व आपल्या बायकोचें लौकिकानें पोट भरील असें लोकांस दिसलें कीं त्यास ते आपली मुलगी देतीलच. मग माझे पश्चात् पोराचें लग्न कसें होईल ? हा बापानें काळजी करण्याचें कारण काय ? लग्नांत योग्यतेबाहेर हुंडा मागण्याची वाईट चाल हल्लीं बळावत चालली आहे, तिचा आपण त्याग केला पाहिजे. हुंड्याकडे लक्ष देण्यापेक्षां मुलांचें शील व कूल यांकडे प्रथम लक्ष द्यावें. आपल्या कुळास शोभेल अशाच कुळाशीं संबंध करावा. ‘ राजाची राणी ती सोम्या पाटलाची मेहुणी ’ असला प्रकार असूं नये. वधुवरांचे स्वभावही मिळते असावे. लग्नांत डामडौलासाठीं बुडीत खर्च फारसा करूं नये. उदाहरणार्थः—लग्नांत शेंपन्नास रुपयांचें दारु-सामान जाळण्यापेक्षां तीच रक्कम गोरगरीबांस अन्न घालण्यांत खर्च केली तर काय वाईट ? लग्नांत रुसणें हें विनोद ह्मणून चालेल; पण या विनोदाचा पुष्कळवेळ अतिरेक होतो. जांवई पीतांबरासाठीं रुसल्यामुळें वाढलेलीं पानें तास दोन तास वाळून जातात व केव्हां केव्हां वरपक्षाकडील वऱ्हाडी मंडळी भोजनास न येतां निराळें जेवण करते ! असले प्रकार ह्मणजे आचरटपणाची कमाल होय. हे लोक भांडण्याची हौस पुरवून घेण्यासाठीं व आपण इतके मूर्ख व पाजी आहों हें दाखविण्यासाठींच आलेले असतात असें ह्मटलें पाहिजे.

मानपानांचा ठराव करणें हा निवळ पोरकटपणा होय ! मी तुमच्याकडे आल्यावर मला अहो, जाहो असा अनेक वचनीं प्रयोग करावा, मला वारंवार नमस्कार करावा व आपण थोर व

विद्वान् असेंही वारंवार ह्मणावें असले ठराव करून मान मिळविणें हा मूर्खपणा नव्हे असें कोण ह्मणेल ? लग्नाचे घाईंत एकमेकांच्या होणाऱ्या चुकांची दुरुस्ती दुसऱ्याची चूक ती आपलीच समजून आपण करावी ह्मणजे झालें. वृद्धापकाळीं लग्न करणें हा अत्यंत अविचारीपणा व नीतिविरुद्ध कृत्य होय. मुलीचे रुपये घेऊन तिला एखाद्या थेरड्यास देणें ह्मणजे कसायांच्यापेक्षांही क्रूर कर्म करणें समजावें. शक्य तितका बालविवाह करूं नये; पण प्रौढ विवाहाचा अतिरेकही करूं नये. रांगत्या नवरानवरीचे विवाह जसे वाईट तसे घोडनवऱ्यांचे विवाहही अनिष्टच होत. गर्भधारणाशक्ति उत्पन्न झाली कीं मुलगी विवाहास योग्य झाली व बीजस्थापनाशक्ति तयार झाली कीं मुलगा लग्नास योग्य झाला असें सामान्यतः समजावें. लहानपणीं लग्न केल्यानें मुलें अशक्त होतात असें ह्मणणारांनीं हाय-स्कुलें व कॉलेजें यांतील अविवाहित मुलांचें निरीक्षण करावें ह्मणजे शेंकडा ऐशीं मुलें सृष्टिनियमाविरुद्ध आपले वीर्याचा नाश करून फिकट झालेलीं आढळतील. मुलांचे डोळ्यापुढें नेहमीं वाईट गोष्टी ठेऊन फक्त त्यांचा विवाह केला नाहीं कीं तीं मारुती किंवा भीमसेन होतील अशी कल्पना करणें व्यर्थ आहे. आमचे मतें अल्पवयांत अशक्तपणा येण्यास व अकालीं कामेच्छा होण्यास नाटकें, कादंबऱ्या, सीनेमा, आशुकमाशुकाचीं चित्रें, हाटेलें व विद्यार्थ्यांची शहरांतील राहणी इतक्या गोष्टी मुख्य आहेत.

मुलगी पसंत करणें ती नवऱ्या मुलानें स्वतः पसंत करावी असें अलीकडे पुष्कळांस वाटतें. हे व्यवहारपंडित असें ह्मणतात कीं, ज्यास जिच्याशीं सगळें आयुष्य काढावयाचें ती मुलगी दुसऱ्यानें पसंत

करून काय उपयोग ? आपणास एकादी गाय, म्हैस घेणें झालें तर ती आपण स्वतः पाहतों. दुसऱ्यावर भरंवसा टाकीत नाहीं, मग लग्नासारख्या महत्वाच्या कामांत दुसऱ्यावर भरंवसा टाकून गळ्यांत लोढणें बांधून कसें घ्यावें ? मुलग्यानें मुलगी पसंत करणें व मुलीनें मुलगा पसंत करणें यांत वावगें तें काय ? आमचे मतें यांत वावगें नाहीं म्हटलें तर नाहीं व आहे म्हटलें तर आहे. मुलगा व मुलगी दूरदर्शी व विचारी असतील तर वावगें नाहीं; पण तीं केवळ कामुक असतील तर सर्वस्वीं वावगेंच. मुलास आपणास चांगली बायको मिळावी अशी जशी इच्छा असते तशी त्या मुलाचे बापास नसते कीं काय ? हा विचार प्रथम करावा. त्यासही आपली सून सुरूप, सद्‌गुणी व शहाणी असावी असेंच वाटतें; परंतु त्याचें लक्ष्य मुलाच्या भावी संसाराकडे असल्यामुळें तो तिचे रूपापेक्षां तिचे ठिकाणीं असलेल्या संसारोपयोगी गुणांकडे जास्त लक्ष्य देतो. तारुण्याचे उमेदींत असणारा मुलगा कामवासनेनें विकारवश झालेला असल्यामुळें तो गुणांपेक्षां रूपच अगोदर पाहतो; पण रूप हें एक दोन मुलें होईपर्यंत टिकणारें असल्यामुळें व संसारांत रूपापेक्षां गुणच उपयोगी असल्यामुळें त्यांचेंच महत्व जास्त आहे. गुणाबरोबर रूपही चांगलें असेल तर उत्तमच. मुलगी पसंत करणारे आईबाप रूपही पाहतात; पण जें त्यांस बरें वाटतें तें मुलास बरें वाटत नाहीं; कारण ' दधि मधुरं मधु मधुरं द्राक्षा मधुरं सुधापि मधुरैव । तस्य तदेवहि मधुरं यस्य मनोयत्र संलग्न ' असा नियम आहे. स्वयंनिर्णय-पद्धति जेथें पूर्णावस्थेस पोंचली आहे व वधुवरें चार दोन महिने एकत्र राहून एकमेकांची सर्व बाबतींत कसून परीक्षा घेऊन विवाह

करितात त्या पाश्चात्य देशांत तारुण्याची डिग्री उतरतांच शेंकडा पाउणशें विवाह रद्द होतात ! ! याचाही आपण विचार केला पाहिजे.

आतां विधवाविवाहाबद्धल थोडा विचार करूं. आमचें या बाबतींत असें स्पष्ट मत आहे कीं, अक्षतयोनी विधवेचा विवाह हा पुनर्विवाह न मानतां पूर्वविवाहच समजावा व इतर विधवांनीं आपले वयास सदृश अशा विधुरांशीं पुनर्विवाह करावे. पन्नास वर्षांचे विधवेनें साठी उलटलेल्या नवरदेवाशीं विवाह केला तरी त्यांत कांहीं गैर होणार नाहीं.

---

# धडा पंचविसावा.

## मागील धड्यांचा उपसंहार.

येथपर्यंत संसारोपयोगी गोष्टींचा सामान्य विचार संक्षेपानें झाला. मागील चोवीस धडे लक्षपूर्वक वारंवार वाचून विचार केल्यास पुष्कळ फायदा होईल. हें पुस्तक केवळ मनोरंजनासाठीं लिहिलेलें नाहीं असें पुस्तक वाचणारानें मनांत आणलें पाहिजे. ज्यास मनोरंजन करावयाचें असेल त्यानें हें पुस्तक वाचूं नये हें बरें. ज्यास पुस्तकांतील बोध पटेल व जो त्याप्रमाणें थोडेंतरी वागण्याचा यत्न करील त्यानेंच हें पुस्तक विकत घ्यावें. ज्यास पुस्तक वाचून वः उत्तम विचार आहेत. हें अगदीं बरोबर लिहिलें आहे, हें लिहिणें अनुभवाचें आहे इत्यादि नुसतें स्तुतिस्तोत्र गावयाचें असेल व त्याप्रमाणें वागावयाचें नसेल तर अशांनीं पुस्तक विकत घेऊन पैसा

फुकट दवडूं नये असें आह्मीं स्पष्ट सांगतों. संसारांत अनेक वस्तूंचा संग्रह करावा. जुनेंपानें सामान निरुपयोगी ह्मणून ताबडतोब फेंकून देऊं नये. तें कोठें तरी एका बाजूस ठेवावें; मात्र मोडक्यातोडक्या सामानाची फाजील अडगळ असेल ती घरांत ठेवूं नये. अशा अडगळींत केरकचरा पडून घाण सांठते. घरांतील जागा अडते व एखादवेळ त्यांत सर्प वगैरे राहण्याचें भय असतें यास्तव अडगळ जास्त असेल तर घरालगत एक छप्पर काढून त्यांत ठेवावी. प्रत्येक लहान मोठी वस्तु महत्वाची आहे हें लक्षांत ठेवावें. पहार मोठी असते व सुई लहान असते पण संसारांत दोन्हींचें महत्व सारखेंच; कारण सुईचें काम पहारीच्यानें होणार नाहीं व पहारीचें काम सुईनें होणार नाहीं.

गडीमनुष्यांस रोज बोलणें अगर शिवीगाळ करणें चांगलें नाहीं. ते काम चुकतील तर वारंवार सांगावें. गडी जर मालकाप्रमाणें शहाणे असते तर ते नोकरच राहिले नसते. ज्यास दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेतां येत नाहीं, तो मूर्ख समजावा; मात्र हा फायदा अगदींच अनीतीनें घेऊं नये व वाजवीपेक्षां फाजीलही घेऊं नये. लहान मुलांस पेढे देऊन त्याच्या हातांतील सोन्याचें कडें घेणें योग्य नाहीं; परंतु एकाद्या जमिनींत मूल्यवान् धातूची खाण लागेल असें आपणांस समजलें तर जमीन मालकापासून त्याला खरा हेतु न सांगतां विकत घेण्यास हरकत नाहीं. या दोन्ही उदाहरणांतील मूळ तत्त्व दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेणें हें एकच आहे; पण व्यवहारदृष्ट्या त्यांत फरक आहे.

भाषण करतेवेळीं फार जपावें लागतें. सार्वजनीक वक्त्यांस बोलतांना जसें राजद्रोहास जपावें लागतें तसें आपणांस घरांत भाषण

करतांना कुटुंबांतील मंडळीचे द्रोहास जपलें पाहिजे. सहज व साध्या भाषणाचा परिणाम एकादवेळ नुकसानकारक होतो.

एक गृहस्थ नोकरीवर असे व त्याचा अविवाहित बंधु घरीं संसार पहात असे. एकदां तो गृहस्थ नोकरीवरून घरीं रजेवर आला, तेव्हां भाऊ ह्मणाला; 'यंदां कलमी आंबे घरांत न खातां सर्व विकून टाकले व पंचवीस रुपये घेतले' हें सांगण्यांत भावाचा उद्देश आपला व्यवस्थितपणा व प्रपंचदक्षता दाखविण्याचा होता. रोजगारी गृहस्थ भावाचें बोलणें ऐकून ह्मणाले. 'तर मग आतां आह्मांस साडेबारा रुपयांचे आंबे विकत घेऊन खाण्यास हरकत नाहीं!' हें बोलण्यांत त्याचा उद्देश माझे वांटणीस साडेबारा रुपये आले आहेत, तेव्हां तेवढ्यांचे आंबे विकत घेतले तर पदरचें कांहीं गेलें असें होणार नाहीं. तेवढे आंबे विकले नाहीं एवढेंच होईल; पण भावाचे मनावर या भाषणाचा परिणाम निराळाच झाला. भाऊ ह्मणाला, एकून मी मात्र आंबा न उष्टावतां याचे प्रपंचाची भर करावी व यानें साडेबारा रुपयांचे आंबे विकत घ्यावे हा खासा न्याय! मला बायको ना पोर. मी पोट बांधून संसार करणार तो भावासाठीं; पण भाऊ आपलें पोट बांधीत नाहीं, इतकेंच नव्हे तर मी माझें पोट जितकें घट्ट आंवळीन तितकें तो आपलें सईल करणार मग मी तरी आपलें पोट काय ह्मणून बांधावें? त्याचे मनांत हा विचार येतांच त्याचा पूर्वींचा कंजूषपणा जाऊन तो बराच उदारवृत्तीचा बनला.

कंजूषपणा चांगला नाहीं व तो मर्यादेचे बाहेर गेला कीं त्याचें वाईटपणास सीमा नाहीं. आमचे माहितींत एक दोन गृहस्थ कंजूष आहेत. हे दोघेही साव[illegible] हेत. दोघांसही खर्च नको पण कीर्ति

हवी यामुळें क्वचित् प्रसंगीं पांथस्थ आला तर त्याची सोई करितात; पण दुसरे दिवशीं आपण उपास काढून झालेल्या जास्त खर्चाची तोंडमिळवणी करतात! या दोन गृहस्थांपैकीं एकाकडे आह्मीं तो गृहस्थ जेवीत असतां एकदां गेलों होतों. इतक्यांत एक मांजर आलें. त्या गृहस्थाचे मुलानें तें आपलें असें समजून त्यास भात घातला व तें खावूं लागलें. इतक्यांत वडील ह्मणाले अरे! हांकव त्यास, तें आपलें नव्हे! मुलानें मांजर हांकविलें व त्याचा उष्टा भात आपले पानावर उचलून घेतला व आपले मांजरास घालण्यासाठीं एका बाजूस ठेवला! मुलास कंजूषपणाचें इतकें शिक्षण देणारा बाप धन्य होय.

रत्नागिरी तालुक्यांत वरवडे गांवाजवळ एका खेड्यांत माधवराव मुळे ह्मणून एक देवरुखी ब्राह्मण होते. यांचें चरित्र अत्यंत बोधप्रद आहे. हे गृहस्थ आठ दहा वर्षांपूर्वीं निवर्तले. माधवरावांचे आईबाप त्यांचे लहानपणींच वारले. सर्व वतन गहाण होतें व निर्वाहाची सोय नव्हती. माधवरावांनीं वरवड्याचे शाळेंत तीन यत्तापर्यंत अभ्यास केला व रत्नागिरीस येऊन शागिर्दीची नोकरी पत्करली; चार पांच वर्षांत सहाशें रुपये मिळविले व आपल्या गांवीं जाऊन वतनापैकीं एक वर्कस ज़मीन चारशें रुपये देऊन सोडविली व त्यांत शंभर कलमी आंब्यांचीं झाडें लावलीं. झाडांस पाणी शिंपणें वगैरे सर्व काम ते स्वतः करीत व निर्वाहाकरितां भिक्षा मागत. दोन तीन वर्षांनीं झाडें जरा मोठीं होतांच ते त्यांवर स्वतः कलमें बांधूं लागले. बांधलेल्या कलमांपैकीं कांहीं विकीत व कांहीं स्वतः लावीत. दिवसोंदिवस त्यांचे धंद्याची भरभराट होत गेली. त्यांची भिक्षा सुटली व या धंद्यावर स्वतःचा निर्वाह करून त्यांस चार वर्षांत सर्व वतन सोडवितां आलें.

वतन सुटल्यावर त्यांचें लग्न झालें. त्यांनीं नवीन जमिनी खरेदी केल्या. बागेंत उत्तम बंगला बांधला व दरसाल हजारों रुपये उत्पन्न येणारे जहागीरदार बनले. माधवरावांचें व्यवस्थितपणाचें एकच उदाहरण सांगतों. मुलग्याचें बाराचे दिवशीं नांव ठेवलें कीं, माधवराव त्याचे नांवचें खातें घालीत व त्याचेसंबंधानें झालेला खर्च त्याचे नांवें लिहीत. मुलगा मोठा झाल्यावर ते त्यास प्रश्न करीत कीं, तुझे जन्मामुळें संसारांत केवढा खड्डा पडला आहे असें तुला वाटतें? तुजबद्दल मी काय खर्च केला अशी तुझी कल्पना आहे? या प्रश्नाचें उत्तर मुलगा काय देणार? माझे मुंजीस पांचशें रुपये लागले असावे इतकेंच तो सांगणार. मुलास बरोबर उत्तर देतां येत नाहीं असें झालें कीं, ते त्यास त्याचें खातें दाखवीत. बाळकडूं, जंतांची पूड, अंगास लावण्याचें तेल, दूध, कपडे, औषधपाणी, भोजनखर्च, विद्येचा खर्च, मुंज वगैरे संस्कारांचा खर्च इत्यादिकांची ती व्यवस्थित यादी पाहून व आपले नांवें हजारांनीं मोजण्यासारखी रक्कम वीस पंचवीस वर्षांत खर्च पडली आहे असें पाहून मुलास काय बरें वाटेल? मुलास खातें दाखवून झाल्यावर ते त्यास ह्मणत कीं, पहा तुझे जन्मामुळें एवढी रक्कम या प्रपंचांतून खर्च झाली. तूं एवढी रक्कम मिळविशील तेव्हां फक्त तुझ्यामुळें पडलेला खाडा तूं भरलास असें होईल व जास्त मिळविशील तेव्हां तूं संसारांत भर घातलीस असें होईल. असा उपदेश करून ते त्यास नोकरीधंद्यास लावीत. माधवरावांचा जमाखर्ची स्वभाव कसा होता हें या गोष्टीवरून कळेल.

‘ प्रसादचिन्हानि पुरः फलानि ’ पुढें होणारासारखी बुद्धि होते अशी ह्मण आहे. गीतेंतही ‘ बुद्धिनाशात् प्रणश्यति ’ असें ह्मटलें

आहे. याचा अनुभव मला एक ठिकाणीं आला. मुंबईस एक आमचे स्नेही आहेत. त्यांचे वडील एक मोठे प्रसिद्ध व्यापारी होते. वडिलांचे पश्चात् आमच्या स्नेह्यांनींही व्यापारांत चांगला लौकिक मिळविला होता. आह्मीं मुंबईस गेलों कीं, ते आह्मांस आपलेकडे बोलावीत; पण आह्मीं फारसे जात नसूं. एकदां गणेशोत्सवांत त्यांचे चाळींत आमचें व्याख्यान होतें ह्मणून त्यांनीं आज दुपारींच इकडे भोजनास या असें आह्मांस सांगितलें. आह्मीं त्याप्रमाणें त्यांकडे गेलों. आह्मीं आल्याची बायकांस वर्दी देण्यासाठीं आमचे मुलास घरांत पाठविलें. मुलानें जेवणाची वर्दी देतांच स्वयंपाकणीचे कपाळास आंठ्या पडल्या व यजमानीन बाईनें इथें खाणावळच आहे असे उद्गार काढले! आह्मीं त्या दिवशीं आमंत्रित पाहुणे होतों; पण घरांतील बायकांस तेवढें खपलें नाहीं. आह्मांस यजमानणीचे भाषणाचें आश्चर्य वाटलें; कारण घराणें थोर, श्रीमंत व उदारपणाविषयीं प्रसिद्ध. आल्यागेल्याचा अड्डाहि मोठा असें असतां या बाईस खाणावळीची भिकार कल्पना कां उत्पन्न व्हावी? अन्नछत्राची कल्पना कां होऊं नये? तपास करितां या बाईचें माहेरचें घराणें उष्ट्या हातानें कावळा न हांकविण्याइतकें उदार होतें असें समजलें व पुढें लवकरच आमच्या स्नेह्याचें दिवाळें निघून आज खरोखरच खाणावळ घालण्याची स्थिति त्यांस प्राप्त झाली आहे!

अस्तु. आह्मांस प्रवासांत अनेक गोष्टींचे अनुभव मिळाले आहेत ते किती ह्मणून लिहावे? आह्मीं या पुस्तकांत ज्या गोष्टी लिहिल्या आहेत, त्या कोणाचेही कुचेष्टेकरतां लिहिलेल्या नाहींत. वाईट गोष्टीं संबंधानें कोणाचा नामनिर्देशही केलेला नाहीं. वाईट गोष्टी

त्यागार्थ समजाव्या व चांगल्या गोष्टी अनुकरणार्थ समजाव्या. यापुढील धडे केवळ विशेषप्रकारचे आहेत. ते केवळ माझे मुलास माझे इष्टेटीची कशी व्यवस्था ठेवावी यासंबंधाचे आहेत पण त्यांचा इतरांसही चांगला उपयोग होईल.

## धडा सव्विसावा.

### आत्मनिवेदन व कुलवृत्त.

रत्नागिरी तालुक्यांतील कोळधें हा गांव तांबे घराण्याचा खोती वतनी गांव आहे. आज सहासातशें वर्षें हा गांव तांबे घराण्याकडेच चालत आहे. मध्यंतरीं पेशवाईंत शहाणे नांवाच्या तांब्यांच्या कारभाऱ्यानें हा गांव उपटण्याचा व्यूह रचला होता पण तो फसला. या घराण्यांतील पुरुषांवर दुष्काळ व पेंढाऱ्यांचे दरोडे यांनीं फार आपत्ती आलेली जुन्या कागदपत्रांवरून दिसून येतें. एकाकाळीं हें घराणें लक्ष्मीचें माहेरघर होतें; पण सरस्वतीची विशेष कृपा कधींच झालेली आढळत नाहीं. आमचे पणजोबा हरीपंत तांबे हे सहा बंधु होते व त्यांचेवेळीं हें घराणें वैभवाचे शिखरास पोंचलें होतें. हरीपंतांचे एक बंधु दिनकरपंत हे पुण्यास कोट्याधीश व्यापारी होते. यांचे पुण्यास चौदा वाडे होते व बडोद्यास दोन वाडे होते. यांनीं कोळधें व त्याचे आजूबाजूचे दहा बारा गांवीं देवळें, तळीं, पूल, पिंपळाचे पार, बांदवाटा वगैरे अनेक धर्मकृत्यें करून ठेवलीं आहेत; या धर्मकृत्यांस दोन लाख रुपये खर्च केल्याची त्यावेळची यादी मिळाली आहे. दिनकरपंत काशीयात्रेस गेले तेव्हां त्यांनीं प्रयाग येथील कुंड

एक लक्ष तीसहजार मोहरा घालून भरलें व तें द्रव्य ब्राह्मणांस दिलें. शिवाय पंचवीस हजार रुपये हत्ती दान व पंचवीस हजार रुपये दांपत्यपूजन इतका दानधर्म केला होता असा दाखला मिळतो.

यांनीं बापूसाहेब ह्मणून दत्तक पुत्र घेतला होता. तो फार तामसी होता. एकदां क्षुल्लक कारणावरून बायकोचें व त्याचें भांडण झालें. त्या भांडणाच्या आवेशांत रागानें बेफाम होऊन या मूर्खानें सर्व संपत्ति व कागदपत्र मुळामुठानदीच्या पुरांत टाकून दिले व वाडे लोकांस खरेदी देऊन टाकून कफल्लक झाला. बायकोस अन्नाकरितां माहेरीं जावें लागलें व बापू अन्न मिळेल तेथें निर्लज्जपणें राहूं लागला.

यांचे पणतु गणपतराव तांबे हल्लीं पुण्यास आहेत. हरीपंत कोलध्यास असत. तेही श्रीमंत व पाणीदार होते. दिनकरपंतांचे वैभवास ते कस्पटासमान लेखीत. तेही मोठे धार्मिक होते. त्यांचा धर्म विशेषतः अन्नदानाचा असे. दिनकरपंतांचे दुसरे बंधु झांशी, जालवण, काल्पी वगैरे ठिकाणीं होते व ते तलवारबहाद्दर होते. झांशीची राणी श्रीमती **लक्ष्मीबाई** ही याच तांबे घराण्यांत उत्पन्न झालेली आहे. राणीसाहेबांचे सख्खे कनिष्ठ बंधु श्री० चिंतामणराव तांबे नागपुरास धनतोलीवर राहतात. आमचे आजीचे हात पेंढाऱ्यांनीं दरोडा घालून लूट केली तेव्हां कांकडे बांधून जाळले होते व त्या भाजलेल्या खुणा आह्मीं पाहिल्या आहेत. दिनकरपंतांचें वैभव बापूसाहेबांनीं घालविलें. हरीपंतांचें वैभव पेंढाऱ्यांनीं नष्ट केलें व झांशी, काल्पी, आणि जालवण येथील ऐश्वर्य सत्तावन सालच्या बंडानें लयास गेलें व या गोष्टी जवळ जवळ एकाकाळींच घडून आल्या, हें एक कालाचें कौतुकच ह्मणावयाचें !

हरीपंतांस सहा मुलगे होते. पेंढाऱ्यांचे लुटीनंतर ते विभक्त झाले. यांत सदाशिवपंत ह्मणून एक पुत्र होते ते माझे आजोबा. सदाशिवपंतांस विनायक, भगवंत, भिकाजी व रघुनाथ असे चार पुत्र होते व सर्व कुटुंब भरभराटींत असून गांवांत पहिल्याप्रतीचें सुखी होतें.

भगवंतराव हे माझे जनक होत. हे शाळामास्तर होते व पुढें पेनशनही मिळालेलें होतें. यांचा स्वभाव अति कंजूष व द्रव्यलोभी होता. प्रकृति फार सुदृढ होती. आहारही दांडगा असे. उद्योगशील-पणा व नियमितपणा हे गुण यांचे वाखाणण्यासारखे होते. स्नान, संध्या व देवदेवतार्चन यांचें प्रस्थ बरेंच असे; पण त्या मानानें अंतःकरणाची शुद्धि झालेली नव्हती. माझी आई शूर, तापट व मोठी पराक्रमी होती. स्वभावही उदार होता. मला तीन भाऊ व दोन बहिणी होत्या. पैकीं दोन भाऊ अल्पायुषी झाले. वडील आपले भावांपासून विभक्त झाले, तेव्हां मी सात वर्षांचा होतों व आई वारली तेव्हां अठरा वर्षांचा होतों. माझें प्रथम लग्न दहावे वर्षी झालें व दुसरें पंचविसावे वर्षी झालें. भगवंतरावांनीं मला आपले चुलतबंधू केरोपंत यांस दत्तक दिलें, मी तेव्हां एकोणीस वर्षांचा होतों.

लहानपणीं मी हूड व अति व्रात्य होतों. प्रकृति सशक्त व पाठ-शक्ति, कल्पनाशक्ति वगैरेंही उत्कृष्ट होती. लहानपणीं चोरीचाही दुर्गुण होताच. स्वभाव चिडखोर व तामसी. एकंदरींत बुद्धिमत्तेवांचून माझी गणना वाईट मुलांतच होत असे. माझें बालपण कांहीं वडिलां-बरोबर नोकरीचे गांवीं व कांहीं कोलध्यास गेलें. घरांतील वस्तु चोरल्याबद्दल वडिलांकडून मारही पुष्कळ खाला पण त्याचा

उपयोग झाला नाहीं. याचें कारण मी दुसऱ्याची वस्तु चोरून घरीं आणली तर वडील मला शाबासकी देत असत ! यावरून गृह-शिक्षण कसें होतें याची कल्पना करावी. वडिलांनीं मला रत्नागिरीस एक वर्ष इंग्रजी शाळेंत ठेवलें होतें. वडिलांचे स्नेही आगाशे ह्मणून एक पेनशनर मास्तर होते त्यांकडे मी रहात असे. आगाशे मास्तरांस माझे चोरीचे गुणांचा चांगला उपयोग झाला. ते मजकडून लोकांचा भाजीपाला रात्रींचा चोरून आणवीत ! एकदां शेजारचे गृहस्थाची केळवंड त्यांनीं मला रात्रीं वर चढवून तोडविली व आपण उचलून घरीं आणली ! याप्रमाणें या ठिकाणचें गृहशिक्षणही कसें होतें हें दिसेल. आश्चर्याची गोष्ट एवढीच कीं, आमचे वडील व आगाशे दोघेही शाळामास्तर होते. असें असून त्यांचें गृहशिक्षण याप्रकारचें असे, मग इतर अडाणी लोकांस हंसावयास नको.

**विद्याभ्यास**—वडिलांचे सहवासांत मी दहा वर्षांचा होईपर्यंतच होतों. तेवढे अवधींत मराठी पांच इयत्ता, रूपावली, समासचक्र व अमराचीं दोन कांडें. तसेंच देवपूजा, रुद्र, सौर, वैश्वदेव इत्यादि विषय झाले होते. मी इंग्रजी शाळेंत वर्षभरच होतों; कारण तेथें शाळेंत एका मुलाचा चाकू चोरल्यामुळें सर्व मुलें रस्त्यानें जातां येतां मला चोर ह्मणूं लागलीं; यामुळें मला तेथून जावें लागलें व इंग्रजी शिक्षणास मुकावें लागलें. रत्नागिरीहून घरीं आलों व त्याचवेळीं ह्मणजे वयाचे दहावे वर्षीं माझें लग्न झालें. नंतर मीं तीन चार महिन्यांनींच पळून गेलों व कांहीं दिवस साखरप्याचे शाळेंत मराठी सहावी यत्ता शिकूं लागलों. साखरप्यासही मी आपले गुण बरेच उधळले. माझे द्वाडपणानें गांवांतील सर्व लोक त्रासले. भुयमूग व गूळ यांच्या गाड्याही

मीं रात्रीं लुटून आणीत असे. साखरप्यास घाणेकर ह्मणून फार तापट व नीतिमान् मास्तर होते, ते मला शिक्षा करीत व बोधही करीत; परंतु माझी खोड गेली नाहीं. मी फार हुशार व बुद्धिमान् मुलगा ह्मणून व गणितविषय उत्तम ह्मणून ते मजवर फार लोभ करीत व या गुणांमुळेंच मला त्यांनीं शाळेंतून काढून टाकलें नाहीं.

एकदां घाणेकरांची व माझी एका विषयावरून तक्रार झाली. मी ती शाळा सोडून घाटावर गेलों. यावेळीं मला तेरावें वर्ष चालूं होतें. मराठी सहावीचा अभ्यास पूर्ण झाला होता व वय सतरा वर्षे पूर्ण झाल्यावांचून परीक्षेस बसतां येत नव्हतें ह्मणून तेथपर्यंत दुसरें कांहीं शिकावें असें मनांत आलें. माझीं हावर्डचीं तीन पुस्तकें झालीं होतींच; तेव्हां इंग्रजी शिकणें बरें असें वाटे व रत्नागिरीस श्री. घांटेशास्त्री यांचें संस्कृत व्याख्यान ऐकल्यापासून संस्कृत शिकावें असेंही मनांत येई. शेवटीं इंग्रजी शिकण्याचा निश्चय करून जमखंडी गांठली पण तेथें सोय होईना ह्मणून परत कोल्हापुरास आलों व जवळ निगवें गांवीं एका कुलकर्ण्याकडे नोकर राहिलों परंतु तेथेंही लक्ष लागेना. महिन्यानेंच तेथून निघालों व भटकत भटकत घाटमाथ्यावरील रामोशी लोकांचे वस्तींत गेलों; तेथें रामोशांचे मुलांची व माझी मैत्री जमली. दिवसा त्यांचेबरोबर जंगल फिरावें, मधाचीं पोळीं आणावीं, यथेच्छ मध खावा व रामोशी शिधा देत तो घेऊन जेवण करावें असा क्रम दोन महिने चालला होता ! इंग्रजी व संस्कृत शिकण्याचे विचारही नष्ट झाले होते. इतक्यांत आप्पा पाटील ह्मणून उंडाळें गांवचा एक सभ्य मराठा भेटला व रामोशांचे घरीं राहिल्याबद्दल त्यानें माझी चांगली खरडपट्टी काढली.

नंतर मी तेथून निघालों व पन्हाळगडास आलों. तेथेंही अभ्यासाचें जमेना ह्मणून बत्तिसशिराळ्यास गेलों. तेथें मात्र मनाप्रमाणें जमलें व पंडित रघुनाथशास्त्री जोशी यांजपाशीं संस्कृत शिकूं लागलों. काव्य, नाटकें, चंपू, कादंबरी वगैरे व्युत्पत्तिग्रंथ झाल्यावर साताऱ्यास संस्कृत शाळेंत पंडित रामशास्त्री गोडबोले यांकडे कौमुदी, मुक्तावली व अलंकार इतकें अध्ययन केलें; इतक्यांत वयास अठरावें वर्ष लागलें. तेव्हां मुलकी परीक्षेस बसण्याचा विचार करून परीक्षेस बसलों व पासही झालों. पास होतांच घरीं आलों. वडिलांस संस्कृत शिकल्याबद्दल जरी आनंद वाटला नाहीं तरी परीक्षा पास झाल्याबद्दल आनंद झाला; कारण आतां कोठें तरी नोकरी लागेल व घरीं चार पैसे येतील अशी त्यांस आशा वाटली. त्यांनीं नोकरीची खटपट सुरू केली. घैसास मामलेदारांकडे कांहीं दिवस शागिर्दी करावी ह्मणजे संधी मिळतांच ते तलाठीची जागा देतील असें ते मला सांगत; परंतु मी शागिर्दी करण्यास कबूल न झाल्यामुळें त्यांनीं राजापुरचे कचेरींत उमेदवारी करण्यास लाविलें. तेथें तीनच महिने राहिलों व तेवढ्यांत त्या नोकरीचा तिटकारा आला व ती सोडून संस्कृत शिकण्यास पुनः गेलों. इतक्यांत एका गृहस्थांनीं ट्रेनिंग कॉलेजांत कांहीं वर्षें शिकाल तर तेथील संस्कृत शिक्षकाची जागा तुह्मांस मिळवून देऊं असें सांगितलें. ह्मणून ट्रेनिंग कॉलेजांत राहिलों. तेथें तीन वर्षें होतों.

बत्तिसशिराळ्यास आल्यावर चोरीचा दुर्गुण अगदीं नष्ट झाला होता व तेथून पुढें मी जेथें गेलों तेथें पूर्ण विश्वासु ह्मणून लोकांचे आदरास पात्र झालों. पूर्वीं चोरी करण्यांत मौज वाटे तर आतां विश्वासु ह्मणून घेण्यांत भूषण वाटूं लागलें. पूर्वींचा द्वाडपणा मात्र

अजीबात गेला नाहीं, तथापि त्यालाही निराळें वळण लागलें. यापुढील फाजीलपणाचें स्वरूप कायदेशीर व पाणीदारपणाचें झालें. ट्रेनिंगकॉलेजांत रावसाहेब साने प्रिन्सिपाल व सर्व शिक्षक यांस माझ्या कायदेशीर व निर्भीड वर्तनाचा अनेक वेळ अनुभव आला. नोकरीवर असतांनाही सर्व अधिकाऱ्यांस तोच अनुभव आला व नोकरी सोडून राजकारणांत शिरल्यावर सरकारासही माझा निर्भीड-पणा व सडेतोड वागणूक पाहण्यास मिळाली.

कॉलेजांत असतांना फावल्या वेळांत संस्कृत ग्रंथ वाचीत असें व पुढें नोकरीवर गेलों तरीही संस्कृत अध्ययन चालूंच होतें. नोकरी सोडल्यावर कुंभकोणमूचे पंडित हालास्यनाथ शास्त्री यांचा सहवास झाला व न्याय आणि वेदांत या दोन शास्त्रांतील पुष्कळ शंका त्यांकडून निरसन करून घेतल्यानंतर नवद्वीपीं गेलों. तेथें ' भट्ट विद्या-भूषण ' ही पदवी मिळाली.

न्याय, व्याकरण, अलंकार व वेदांत या विषयांत माझी थोडीफार गति आहे मी हजारपर्यंत संस्कृतग्रंथ वाचले आहेत. चरित्रें, इतिहास व पदार्थ-विज्ञानादि भौतिकशास्त्रांचें वाचन बरेंच झालें आहे व चिकित्साबुद्धीनें विचारही केला आहे. ज्योतिषाकडे मात्र मुळींच लक्ष न दिल्यामुळें मला पंचांगही पाहतां येत नाहीं ! मला गाण्याची आवड नाहीं व आवाज वाईट असल्यामुळें स्वतः गातांही येत नाहीं. इस्पिकें, गंजिफा, सोंगट्या व बुद्धिबळें या खेळांची मला मुळींच माहिती नाहीं व आवडही नाहीं. भौतिकशास्त्रांत यंत्रशास्त्राची आवड फार व त्यांत कल्पनाही चालते. प्रपंचांत लागणारीं बहुतेक सर्व कामें मला येतात.

गवंडीकाम, सुतारकाम, स्वयंपाक, बुरुडकाम, कापड विणणें, कांचेच्या बांगड्या करणें, झाडावर चढणें, पोहणें, घोड्यावर बसणें वगैरे अनेक कलांत माझें कधीं अडणार नाहीं. मात्र मी कधीं नांगर धरलेला नाहीं. मला कविता करण्याचाही थोडा नाद आहे.

माझें पुराण नवीन पद्धतीचें व व्याख्यानासारखें असे, यामुळें मंडळी फार जमे. मी राजकीय विषयावरही व्याख्यान देत असे यामुळें सरकारास मी एक राज्य उलथून पाडण्याचा यत्न करणारा क्रांतिकारक आहें असें वाटलें व माझेवर पोलीसची देखरेख सुरू झाली. पुष्कळ ठिकाणीं पुराणास बंदी व हद्दपारी झाली. नाशकास तर मला पकडण्यासाठीं घोडेस्वार व पायदळ पलटणी यांचा सरकारनें वेढा घातला होता. मी हातीं लागलों नाहीं ही गोष्ट निराळी. माझे पुराणास बंदी केल्यामुळें मी नुकसानीचे दाव्याची नोटीस दिली तेव्हां पुराणबंदीचा हुकूम रद्द झाला. नंतर मी केलेल्या पुस्तकांत राजद्रोहाचें संशोधन चालू झालें व वर्णधर्म-मीमांसा नांवाचें पुस्तक सरकारनें राजद्रोही ठरवून मला एक वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली.

या खटल्यामुळें माझीं बरींच पुस्तकें सरकारजमा झालीं. नवीं लिहिलेलीं पुस्तकें छापणें बंद पडलें व एकंदरींत पंधरावीस हजारांची ठोकर लागली. तुरुंगांतून सुटून घरीं आलों; पण तीन चार महिन्यांतच झाडावरून पडून दोन्ही पाय गेले, यामुळें जन्माचा व्यंग झालों. वडिलार्जित देणें कायम होतेंच. सरकारचे त्रासामुळें लेखन-व्यवसाय थंडावला व शरीर व्यंग झाल्यामुळें पुराण सांगण्यास कोठें फिरतांही येईना. अशा आपत्तींत आणखीही कर्ज झालें होतें;

पण माझे बालमित्र कै० प्रो० काशीनाथपंत छत्रे यांनीं हजारों रुपयांची मदत केली !

---

# धडा सत्ताविसावा.

## मुलास उपदेश.

गणपति तूं हें सर्व पुस्तक वारंवार वाच व त्यांत दाखविलेल्या चांगल्या मार्गानें चाल ह्मणजे तुझें कल्याण होईल. आमची वडिलार्जित इस्टेट काय होती हें मागले धड्यावरून तुला समजेल. सध्यांची स्थिति तुला दिसत आहेच. आज घरांत वाडिलार्जित वस्तु दाखवावयाच्या ह्मटल्या तर एक जातण व दोन तीन देव यावांचून कांहीं नाहीं. वतन गहाण होतें व दुसरेंही कर्ज फेडावें लागलें. यामुळेंच स्थावर इस्टेटही विकत घेतल्याप्रमाणेंच झाली.

घर वगैरे सर्व नवी तयारी करावी लागली. आज बागबागाईत व सागाचें जंगल तसेंच आंब्याची बाग व फणस वगैरे जीं झाडें व घरें तुला दिसत आहेत तीं सर्व मी स्वकष्टानें तयार केलीं आहेत. मी स्वतः दगड फोडून जमीन तयार केली. झाडांची जोपासना मुलांप्रमाणें केली. काम करतांना रात्र ह्मटली नाहीं कीं दुपारचे कडक उन्हाची पर्वा केली नाहीं. माझे हातास काम करून पडलेले घट्टे अजून गेले नाहींत. मी हें केवळ स्वतःचे प्रतिष्ठेकरितां तुला सांगत नाहीं तर हें सांगण्याचा हेतु तूं, मी इतक्या मेहनतीनें संपादन केलेली इस्टेट नीट सांभाळावी व तूंही उद्योग करावा हा आहे.

गांवांतील कांहीं भाऊबंदांनीं माझा खून करण्याचाही बेत केलेला होता. मला निरोपही आलेले होते; पण मी तिकडे लक्ष दिलें नाहीं. माझें ज्यांनीं नुकसान केलें त्यांचें मी नुकसान केलें नाहीं. कांहीं फायदाच केला आहे. तूंही कोणाचें नुकसान करण्याची बुद्धि धरूं नको. मात्र स्वहिताविषयीं दक्षता ठेऊन गांवांतील सर्व लोकांची मनांत पारख करून त्यांशीं वाग. कोणाशीं विशेष स्नेहही नसावा व वैरही नसावें. कामावांचून कोणाकडे जाऊं नये, कोणाची निंदा स्तुति करूं नये. हलकट लोकांची संगति चांगल्या कामांतही करूं नये. हलकट लोक देवाचें भजन करूं लागले तरीसुद्धां आपण त्यांचे मेळ्यांत जाऊं नये; कारण दुष्टांच्या भक्तीचें फळही दुष्टच असतें. एकादशीस भजनाकरतां देवळांत जाऊन नीचपणाचें कृत्य करणारा व शिमग्याचे निमित्तानें गांवभर लुटालूट करणारा व करविणारा हे लोक सभ्य ह्मणून मिरवोत, ते बाबा असोत कीं, बाबूराव असोत; पण हीं कृत्यें पाजीपणाचीं व हलकटच होत. तूं असल्या लोकांची संगति धरूं नये व असलीं कृत्यें करूं नये. जो हलकट व पाजी-पणाच्या कर्मांपासून कधींही च्युत होत नाहीं असा जो अच्युत असेल त्यास बोध करूनही उपयोग नाहीं. तो स्वकर्माचीं फळें भोगील असें मानून स्वस्थ असावें व त्याची सांवलीसुद्धां घेऊं नये; पण त्याचा द्वेष अगर नुकसानही करूं नये.

लोकांच्या कुटाळ्या करण्यांत व लावारावी लावण्यांत वेळ खर्च करण्यापेक्षां आपले बागबागायताचे उद्योगांत खर्च केलास तर त्यांत तुझा फायदा होईल. घराचीं कोणतींही कावाडकष्टाचीं कामें करण्यास कंटाळूं नये व लाजूं नये पण केवळ कावाड कामें करणा-

रास विद्येवांचून मान मिळत नाहीं हें लक्षांत ठेऊन विद्याही संपादन करावी. प्रापंचिक मनुष्यास कोणती विद्या पाहिजे हें या पुस्तकांत सांगितलें आहेच; तेवढी तरी संपादन कर.

मी लावलेल्या झाडांचें तूं रक्षण केलेंस व घराची निगा राखलीस तर तुझें व तुझे मुलांचेही हयातींत अन्नवस्त्रास कमी पडणार नाहीं. शिवाय तूं सुद्धां झाडें लाव व नव्या जमिनी तयार कर. मला कर्ज बरेंच आहे पण तें मी फेडीन अशी उमेद आहे. मी तुमचेंकरितां पैसा मिळवून ठेवला नाहीं व ठेवणारही नाहीं. मी तुमचेकरितां झाडामाडांची ठेव ठेवली आहे. तुह्मीं मेहनत कराल व दक्षता ठेवाल तर पैशाचे ठेवीपेक्षां हीच ठेव तुमचें कल्याण करील. तुह्मीं दोघे भाऊ विभक्त न व्हाल तर उत्तमच; पण झाल्यास एका घराचे दोन भाग करूं नका. एकानें बागेचे बंगल्यांत राहावें व एकानें सध्याचें घरांत राहावें. इमारतींचे किंमतींतील फरक पैशाचे रूपानें पुरा करावा ह्मणजे झालें.

या पुस्तकांत पटवर्धनांच्या कुटुंबाची हकीगत दिली आहे तो कित्ता तूं घ्यावा. मला अजून बऱ्याच सुधारणा करावयाच्या आहेत. मी कांहीं वर्षें वांचलों व मला सामर्थ्य झालें तर मी त्या करीनच; पण माझे हातून न झाल्यास त्या गोष्टी तूं कराव्या. मला करावयाचीं कामें येणेंप्रमाणें आहेतः—

१. निवई, भैरवदाभ, पैकडी व चिंचेची घांटी या मालकीच्या ठिकाणांस गडगे देऊन बंदोबस्त करणें. कांहीं ठिकाणांत गडग्यांस आरंभ झालेला आहेच.

२. निवईत वरचे खडग्यांत साग लावणें व खालचे भागांत गडग्याचे आंत बाजूनें फणस लावणें. या ठिकाणांत पांचशें सागवान व पन्नास फणस झाडें होतील.

३. चिंचेची घांटी व भैरवदाभापैकीं कांहीं भाग गुरांचे गवतासाठीं ठेवणें.

४. पैकडीस गडगा दिल्यावर तेथें साग लावणें. या ठिकाणांत तीन हजारपर्यंत सागवान होईल. हें ठिकाण घरापासून दूर आहे. शेती करणारे लोक ह्मार यामुळें धड वसूल मिळत नाहीं. आंबेफणसांचें उत्पन्न केल्यास चोरांचा त्रास; यास्तव येथें सागाचेंच जंगल करावें.

५. भैरवदाभ यांत हल्लीं लावलेल्या कलमी आंब्यांचे गडग्यांत व पायरीकडे मिळून शंभर कलमी आंब्यांचीं झाडें होतील. तसेंच निगडीचे भाट्यापैकीं धरणावरील जमीन जगन्नाथ सिताराम तांबे यांपासून जुवींतील जमीन मोबदला देऊन ज्या दोन जमिनी घेतल्या त्यांपैकीं आहे. त्या जमिनीस गडगा दिल्यास तेथेंही पन्नास कलमी आंब्यांचीं झाडें लावतां येतील. सदर ठिकाणांत हल्लीं फणसाचे वगैरे रोपे आहेत ते सर्व आमचे आहेत. गुरवांकडे तें ठिकाण लागवडीस आहे; ते झाडांवर हक्क सांगतील तर तो खरा नाहीं.

६. दाभांत आमचे जमिनीस लागून हरीभाऊ तांबे यांची जमीन होती. ती खरेदीदार श्रीनिवास दत्तात्रय तांबे यांपासून मी त्यांस आमचा नंबर पिंपळाची धार हा देऊन मोबदला घेतली आहे. या सर्व जमिनीस गडगा देऊन झाल्यावर वरचे सपाटीस चार खंडीस भात शेत पडेल. शेत धरपाण्यावरचें असल्यामुळें पाण्याची सोई केली पाहिजे. ही सोई दोन प्रकारांनीं होईल. एक

प्रकार देव्हारण्याचे कातळावर तलाव खोदून पाण्याचा सांठा करणें व पाटानें पाणी आणणें. दुसरा प्रकार विहीर खोदून तळांतून बोगदा पाडून नळ घालून पाणी आणणें. विहीरीस पाणी लागलें असें ह्मणतात. आष्टाचे झाडाजवळ सारणींत दहा हातांवर पाणी आहे असें पाणी पाहणारानें सांगितलें आहे. तलाव करणें झाला तरी तो तेथेंच करणें सोईचें आहे. विहीरीस पाणी लागलें तर तें बागेचेही उपयोगी पडेल व पावसाळीं भातशेती व उन्हाळीं वरणा यांचे उपयोगी पडून फार फायदा होईल. ही जमीन दुसऱ्याची आहे व पाणी न्यावयाची जागाही दुसऱ्याचीच आहे. यास्तव त्यांस कांहीं पैसे देऊन हक्क संपादन केला पाहिजे. या कामास कदाचित् तीन हजार रुपयेही लागतील; पण फायदा होईल.

७. कोंडांत आमची जमीन आहे त्यांत मी हल्लीं चाळीसपर्यंत फणसाचीं झाडें केलीं आहेत. आणखीं पन्नास झाडें होतील व दहा मणापर्यंत जास्त भातजमीन तयार होईल. ठिकाणास गडगा दिला पाहिजे. शेतास पाणी रामकृष्णपंत तांबे यांचे जमिनींतून त्यांनीं परवानगी दिल्यास आणतां येईल अगर कोंटांत वर कातळावर लहानसें तळें केल्यास तेंथून पाटानें पाणी घेतां येईल. कोंटचे जमीनदारांस कांहीं देऊन हक्क मिळवावा लागेल.

८. ठिकाण भोक्षा येथील शेताचे बांध दुरुस्त करणें व त्यास तारेचें कुंपण करणें, पाटास सिमेंट घालून उन्हाळी पाण्याचा पुरवठा करणें व शेतांतून शेत कायम राखून नारळी लावणें.

इतकीं कामें करण्याचें माझे मनांत आहे. या सर्व कामांस दहाहजारांपर्यंत खर्च येईल. माझे हातून होईल तें मी करीन. राहील तें

तूं करावें अशी माझी इच्छा आहे पण कर्ज काढून मात्र कांहीं करूं नको. पैसे मिळवून कर. चिकाटीनें उद्योग कर ह्मणजे हीं कामें सहज होतील. दहा हजार रुपये कामास लागतील असें सांगितलें ह्मणून घाबरूं नको. धैर्य धरशील व उद्योग करशील तर तुला दहा लाख रुपये सुद्धां मिळतील व हें माझे हातून कसचें होतें, हें अशक्य असें ह्मणशील तर तुझे हातून कांहीं होणार नाहीं व तुला पैही मिळणार नाहीं. माझे पश्चात माझें श्राद्धपक्ष करून व मला तर्पण करून आपली पितृभक्ति दाखवून मला तृप्त करण्यापेक्षां या पुस्तकांत लिहिलेल्या चांगल्या गोष्टींचें तुह्मीं अनुकरण केलेंत तरच मी तृप्त होईन. तेंच तुमचें पितृतर्पण व माझें खरें श्राद्ध होय. तुह्मीं दुर्व्यसनांनीं कर्जबाजारी झालेत, गांवकुटाळांचे संगतीनें कज्जेदलाल बनलेत, आळसानें दारिद्रास आमंत्रण दिलेंत, अविद्येमुळें विद्वानांचे अनादरास पात्र झालेत, अव्यवस्थितपणानें आपलें वतन घालविलेंत व क्षुद्रबुद्धीनें आपसांत भांडत बसलेत तर तुह्मीं मला भाताचे पिंड देऊन मी संतुष्ट होणार नाहीं. श्राद्धपक्षाचे खिरीनें फक्त भट तृप्त होतील व तुह्मीं तृप्त व्हाल. मला असल्या नादान मुलांचे कर्माची गरज नसल्यामुळें मी तृप्त होणार नाहीं.

आपल्या मालकीचे जमिनींत कोणासही घर बांधण्यास जागा देऊं नये. एकदां मनुष्य चांगला वाटतो व त्यास दिल्यानें आपला उपयोग होईल असें मनांत येतें पण त्याच मनुष्याची बुद्धि पुढें बदलते. त्याचीं मुलें त्याचेप्रमाणें असतात असा नेम नाहीं. ते पुढें कायद्याच्या गोष्टी सांगून जमीन बळकावण्याचा यत्न करतात. त्यांचे गुरांवासरांचा आजूबाजूचे जमिनीस उपद्रव होतो व ते लोक जितके लोकांचे

उपयोगी पडतात तितके सुद्धां आपल्या उपयोगी पडत नाहींत. कित्येक लोक असे लबाड आहेत कीं, दुसऱ्याचे जमिनींत एकादा आंब्याचा किंवा फणसाचा रोपा उगवलेला आढळल्यास त्यास एक काठी लावून ठेवावयाची व तें माझें हात झाड ह्मणून हक्क सांगावयाचे. या लोकांची मेहनत ह्मणजे एक वर्ष काठी लावणें या पलीकडे नसते. त्यास ते पाणी घालीत नाहींत अगर कुंपणही करीत नाहींत. झाड अडचणींत असलें कीं आपोआप सुसंरक्षित असतें व वाढतें. अशा झाडावर मालकी एकसाल काठी लावणाराची होते व तो फणसझाडाबद्दल चार दोन आणे जमिनीच्या मालकास घे ह्मणतो पण तेही सत्रावेळ तगादा केल्याशिवाय देत नाहीं व आपण दरसाल पांच रुपयांचेंही उत्पन्न मिळवितो ! आंब्याचे झाडाबद्दल तर तो पैही देत नाहीं व चार आंबे आपणांकडे आणून पोंचवीत नाहीं. आपले जमिनींतील झाड ह्मणून आपण एकाद वेळ चार आंबे काढले तर ते त्यास सहन होत नाहींत. या गोष्टींचे मला अनुभव आल्यामुळें मुद्दाम लिहिणें भाग आहे कीं, आपल्या जमिनींत कोणीही झाड केल्याची तक्रार केल्यास ऐकूं नये व त्यास यत्किंचितही हक्क देऊं नये. वांट्यानें शेतभात करावें पण झाडें करूं नयेत. झाडें अगदीं हद्दीवर लावूं नयेत.

गडी मनुष्यानें केलेल्या कामाची आपण स्वतः तपासणी करावी. केवळ त्यावर भरंवसा टाकून स्वस्थ बसूं नये. पुस्तक संग्रह व वतन संबंधीं कागदपत्र यांस फार जपावें. जमाखर्च नीट ठेवावा व जगांत लौकीक संपादावा. आपले हातून होईल तितकी देशसेवा करावी. देशाचे कल्याणासाठीं जरी तुमची सर्व इस्टेट गेली तरी हरकत

नाहीं. व्यसनादिकांनीं भिकारी होण्यापेक्षां देशकार्यास सर्वस्व अर्पण करून भिकारी व्हावें. देशद्रोही होऊन अमीर होण्यापेक्षां देशभक्त होऊन फकीर होणें उत्तम व रोगानें मरण्यापेक्षां देशसेवेंत मरणें चांगलें एवढें सांगून हा धडा पुरा करतों व एकंदर उपदेशाचें सार ह्मणून पुढील श्लोकांश लिहिला आहे तसा वाग असें सांगतों. ' नतत्परस्य संदध्यात् नेच्छेत् यत्स्वयमात्मनः ' लोकांनीं तुझ्याशीं जसें वागावें असें तूं इच्छितोस तसाच तूं लोकांशीं वाग हेंच खरें धर्मतत्व असून या पुस्तकाचेंही सार आहे.



# उपसंहार .

हातीं घेतलेला विषय अगदीं संक्षिप्तरीतीनें कां होईना पण एक-दांचा पुरा झाला. ' आधीं केलें मग सांगितलें. ' अशी जरी माझी योग्यता नाहीं हें मी प्रांजलपणें कबूल करतों तरी व्यवस्थित संसाराचे बाबतींत मी आधीं केलें मग सांगितलें असेंच मला लोक ह्मणतील त्यामुळेंच मी हें पुस्तक लिहिण्यास पात्र आहे असें ठरेल.

माझे ठिकाणीं तरी सर्वच गुण चांगले कोठें आहेत ? जर मूर्तिमंत सद्गुणांचा पुतळा असतों तर लोकांनीं मला त्रास दिला नसता व दिला असता तरी मी तो मानला नसता व प्रतिकारही केला नसता. मी तसा गुणी नाहीं कीं साधुही नाहीं; तथापि उगाच कोणाची टवाळी किंवा निंदा करावी इतका दुर्जन स्वभाव माझा नाहीं असें माझें मन मला सांगतें. मी दुर्जनांचा द्वेष करीत नाहीं. मला त्यांस सज्जन करण्याचें सामर्थ्य नाहीं ह्मणून मात्र वाईट वाटतें. जगांत सज्जन लोक पाहिजेत तसे कांहीं दुर्जनही पाहिजेत. ' वाईटानें भलें हिनें दाविलें चांगलें ' हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एकाच रंगानें चित्र काढतां येणार नाहीं. कागद पांढरा व त्यावर चित्र काढण्यास घेतलेला रंगही पांढराच मग तें चित्र दिसावें कसें ?

ईश्वरानें हें जगच्चित्र अनेक रंगांनीं खुलविलें आहे व हे सर्व रंग आहेत तेथपर्यंतच जग आहे. आपले मनास एकादें वाईट दिसलें तरी तें सर्वथा वाईट असतें असें नाहीं. आपल्या एकदेशी विचारांस जी गोष्ट वाईट वाटते तीच अनेकदेशी विचारांनीं चांगली ठरते.

उदाहरणार्थ वेश्या घ्या. वेश्यावर्ग अनीतिमान् असल्यामुळें तो नष्ट होईल तर बरें असें सक्तदर्शीनीं मनांत येतें; पण तो नष्ट झाल्यास फार वाईट प्रसंग येतील व कुलीन स्त्रिया पातिव्रत्यास मुकून जुलमानें वेश्यांच्या योग्यतेस पोंचतील असें समजावें; कारण आंधळे, पांगळे, दरिद्री व अन्य कारणांनीं ज्यांचें लग्न होत नाहीं अशा लोकांनीं आपली विषयवासना कोठें पूर्ण करावी? वेश्या आहेत म्हणून अशा लोकांची सोय आहे. वेश्या नसत्या तर त्यांनीं कुल-स्त्रियांवरही जुलूम केले असते. यावरून वेश्यावर्ग वाईट असें कसें म्हणावें? वेश्यांस दोष देण्यापेक्षां ज्यांस बायका आहेत असे लोक वेश्यालंपट होतात, त्यांसच दोष दिला पाहिजे. डोळ्यांनीं चांगलें दिसत असतां चष्मा लावणें हा मूर्खपणा होय. दृष्टि मंद झाल्यावर खुशाल आरशी लावावी. सारांश, जगांत आहे तें सर्व चांगलें व उपयुक्त आहे. योग्य योजना करतां आली पाहिजे, एवढेंच मुख्य तत्त्व आहे व संसारांत हेंच शिकावयाचें आहे.

संसारार्णविं पोहतां गटकळ्या खाऊनियां भागलों।
आवर्तीं भ्रमतां बहूत दमलों खडकांवरी ठेंचलों।
केव्हां नक्रमुखीं पडूनि सुटलों केव्हां बुडालों जळीं।
संसारार्णववृत्त लोकिं कथण्या आलों पुन: स्वस्थळीं॥

